**मौजे वाकडी ता. केज, जि. बीड येथील पूरग्रस्तांच्या पुनर्वसनासाठी संपादीत जमीनीचा निवाडयानूसार मोबदला मा.न्यायालयात भरणा करण्यासाठी निधी उपलब्ध करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. एलएफडी-२०२२/ प्र.क्र.१०६/र-१२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक - २८ मार्च २०२३

**शासन निर्णय :-**

विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी दि.१७/१०/२०२२ च्या प्रस्तावाच्या अनुषंगाने मौजे वाकडी ता. केज, जि. बीड येथील पूरग्रस्तांच्या पुनर्वसनासाठी भूसंपादन प्रकरणात भूधारक मुरलीधर एकनाथ, शिवरास व सुखदेव रामराव आणि मंगलाबाई जीवनराव शिवगण (जीवन परसराम यांच्या पत्नी), यांचे सर्व्हे क्र. ४ ब, ४ क व ४ ड मधील एकूण १.६२ हे.आर क्षेत्र जमीन संपादीत करण्यात आली आहे. सदर जमीनीचा भूमी संपादन पुनर्वसन व पुन:र्स्थापना करतांना वाजवी भरपाई मिळण्याचा व पारदर्शकतेचा हक्क अधिनियम २०१३ नूसार कलम २६ ते ३० मधील तरतुदीनूसार अंतिम निवाडा दि.२२/०८/२०१६ रोजी घोषित झाला असून त्याचा मोबदला रु.१७,६५,८००/- निश्चित करण्यात आला आहे. सदर मान्य झाल्याने मा. उच्च न्यायालयाच्या आदेशान्वये निवाडा घोषित झाल्याच्या दिनांकानूसार मोबदल्याची रक्कम अदा करण्यासाठी एकूण रु.१७,६५,८००/-एवढा निधी इतका निधी विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी मागणी केल्यानूसार सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/१३/विनियम, भाग-२, दि.१७/०४/२०१५ अनूसार वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग-पहिला, उपविभाग-३ अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र. २७(२)(अ) अनूसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारानूसार, मुरलीधर एकनाथ, शिवरास व सुखदेव रामराव आणि मंगलाबाई जीवनराव शिवगण (जीवन परसराम यांच्या पत्नी), यांच्या भूसंपादनासाठी भूसंपादीत जमीनीचा मा. न्यायालयाने दिलेल्या निर्णयानूसार भूसंपादनाचा मोबदला अदा करण्यासाठी सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतुदीतून रु.१७,६५,८००/-(रुपये सतरा लक्ष पासष्ट हजार आठशे फक्त) इतका निधी "मागणी क्र.सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ सहाय्य, ०२-पूर चक्रीवादळे, (९३) इतर (९३) (०३) पुरामुळे बाधीत झालेल्या व्यक्तिंच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, घरे इ. बांधकामासाठी संपादन केलेल्या/अधिग्रहित केलेल्या जमिनीबद्दल नुकसानभरपाई देणे (अनिवार्य), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२४५ ०१८२)" या लेखाशिर्षाखाली विभागीय आयुक्त, नागपूर यांना खालील वित्तीय शिस्तीच्या अधिन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबधितांनी खालील सुचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी भूधारकारस अदा करण्यासाठी रु.१७,६५,८००/- इतका मोबदला रक्कम अंतिम व योग्य असल्याची खातरजमा करुन, सदर रक्कम भूधारकास तात्काळ अदा करावी.

२) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी मा. न्यायालयाच्या आदेशानूसार वाढीव मोबदला मंजूरीचे आदेश तात्काळ निर्गमित करावेत.

३) अदा करण्यासाठी मंजूर केलेल्या बाबी व्यतिरिक्त अन्य बाबीवर अनुदान खर्च होणार नाही याची विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी दक्षता घ्यावी.

४) या शासन आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला निधीपेक्षा कोणत्याही परिस्थितीत अधिक निधी खर्च होणार नाही तसेच मा. न्यायालयाच्या निर्णयानूसार मोबदला अदा करण्यास विलंब होणार नाही याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

५) सदर आदेशात नमूद लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक राहणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account/PLA (स्वीय प्रपंजी खाते) मध्ये जमा करुन ठेवण्यात येणार नाही याची संबंधित अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

६) या लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनूसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नंतर या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादी कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावे.

७) या संदर्भातील खर्च विवरणपत्रे / अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधीसंबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconciliation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

८) संबंधित अधिकारी यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी / विभागीय आयुक्त / शासनास तातडीने सादर करावे.

३. सदर बाबीवरील खर्च भागविण्यासाठी विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांना रु.१७,६५,८००/-(रुपये सतरा लक्ष पासष्ट हजार आठशे फक्त) इतका निधी BEAMS प्रणालीवर निधी उपलब्ध करून देण्याची कार्यवाही कक्ष अधिकारी (म-११), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतिक क्रमांक २०२३०३२८१९२२१६६२१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHULARAM R NIKHARE

Digitally signed by CHULARAM R NIKHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=888a9197d5a4831c7e5ef0c4328259521ba94feaafdffbadf353be3592552a31,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E37123E923CF43F99F06B54384FF491E5F703F14D653B5A59D47EAB1F73E2597, cn=CHULARAM R NIKHARE
Date: 2023.03.28 19:26:38 +05'30'

(चु. रा. निखारे)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रती**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रक अधिकारी (पुनर्वसन), औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
२. उप आयुक्त (पुनर्वसन), औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
३. जिल्हाधिकारी, बीड
४. उपविभागीय अधिकारी तथा उपजिल्हाधिकारी (भूसंपादन) अंबाजोगाई
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १/२, मुंबई /नागपूर
६. महालेखापाल (लेखापरीक्षा) -१/२, मुंबई /नागपूर
७. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड
८. महसूल व वन विभाग कार्यासन ब-१/ अ-४/पीएसी/ म-११, मंत्रालय, मुंबई
९. निवड नस्ती र-१२

---------